महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य, सेवा, गट-अ मधील विशेषज्ञ संवर्गातील **“बधिरीकरण तज्ञ”** या पदावर नामनिर्देशनाने नियुक्तीबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः नामनि-१४२२/प्र.क्र.४१०/सेवा-२**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत, १० वा मजला
मंत्रालय, मुंबई-४०० ००१
तारीख: २८ एप्रिल, २०२३

<u>वाचा :-</u>

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र.पीएचआर-१०२२/प्र.क्र.४३/२०२२/अठ्ठावीस, दि.२१ डिसेंबर, २०२३.

**आदेश :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून संदर्भाधीन पत्रान्वये महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ (वेतनस्तर एस-२३ : ६७७००-२०८७००) मधील विशेषज्ञ संवर्गातील “बधिरीकरण तज्ञ” या पदावर नामनिर्देशनाने नियुक्तीसाठी गुणवत्तेच्या आधारे शिफारस करण्यात आलेल्या खालील उमेदवारांची नामनिर्देशनाने तात्पुरत्या स्वरुपात नियुक्ती करण्यात येत असून त्यांची स्तंभ क्र.५ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी पदस्थापना करण्यात येत आहे.

| क्र. | अधिकाऱ्याचे नाव | मूळ प्रवर्ग | नियुक्तीचा प्रवर्ग | “बधिरीकरण तज्ञ” या पदावरील नियुक्तीचे ठिकाण |
|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) |
| १ | **डॉ. रविंद्र प्रकाश सोनावणे** | इ.मा.व. | इ.मा.व. | **जिल्हा सामान्य रुग्णालय, धुळे** |
| २ | **डॉ. आकाशदिप नारायण पवार** | वि.जा-अ | वि.जा-अ | **स्त्री रुग्णालय, नेकनूर, बीड** |
| ३ | **डॉ. बाळकृष्ण रामभाऊ बागवाले** | इ.मा.व. | इ.मा.व. | **संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती** |
| ४ | **डॉ. चंद्रकांत विठ्ठलराव क्षीरसागर** | इ.मा.व. | इ.मा.व. | **स्त्री रुग्णालय,सोलापूर** |
| ५ | **डॉ. अमोल विश्वनाथ धुळधुळे** | अ.जा. | अ.जा. | **जिल्हा सामान्य रुग्णालय, वाशिम** |
| ६ | **डॉ.संजय जगन्नाथ पाटील** | आ.दु.घ. | आ.दु.घ. | **जिल्हा सामान्य रुग्णालय, सातारा** |
| ७ | **डॉ. वृषाली माधवराव एमेकर** | इ.मा.व. | इ.मा.व. | **जिल्हा सामान्य रुग्णालय, वर्धा** |
| ८ | **डॉ.विनोद अर्जुनराव गायकवाड** | अ.जा. | अ.जा. | **सामान्य रुग्णालय, मालेगाव, नाशिक** |
| ९ | **डॉ. सोनाली सुंदरसिंग जाधव** | वि.जा.-अ | भ.ज.-ब | **जिल्हा सामान्य रुग्णालय, रत्नागिरी** |
| १० | **डॉ. राहूल सुरेश बागडे** | अ.जा. | अ.जा. | **स्त्री रुग्णालय, गोंदिया** |
| ११ | **डॉ.अर्चना लहानू वासुकर** | अ.जा. | अ.जा. | **मध्यवर्ती रुग्णालय, उल्हासनगर-४** |

२. सदर नियुक्ती खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून करण्यात येत आहे :-

**(१)** ) महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ मधील विशेषज्ञ संवर्गातील "बधिरीकरण तज्ञ" या पदाचा कार्यभार स्विकारल्याच्या दिनांकापासून दोन वर्ष इतका कालावधी हा परिविक्षा कालावधी राहील. परिविक्षाधीन कालावधीत त्यांनी अपेक्षित दर्जा प्राप्त न केल्यास किंवा वर्तणूक अयोग्य, अपेक्षित दर्जाची अथवा असमाधानकारक आढळल्यास त्यांची सेवा संपुष्टात आणली जाऊ शकेल किंवा त्यांचा परिविक्षाधीन कालावधी आवश्यक त्या कालावधीसाठी वाढविला जाईल. अशा वाढलेल्या काळामध्ये त्याचे काम समाधानकारक झाले नाही तर, त्याची सेवा कोणत्याही पूर्वसूचनेशिवाय संपुष्टात आणली जाईल. तसेच परिविक्षा कालावधी पूर्ण केल्याशिवाय त्यांना पुढील वेतनवाढ अनुज्ञेय होणार नाही.

**(२)** सदर उमेदवारांस त्यांच्या नावाची नोंदणी महाराष्ट्र वैद्यकीय व्यावसायिक अधिनियम, १९६१ अथवा महाराष्ट्र वैद्यकीय परिषद अधिनियम, १९६५ खाली या नियुक्तीपूर्वी केली असली पाहिजे किंवा भारतीय वैद्यकीय नोंदवही मध्ये नियुक्तीपूर्वी नोंद झाली असली पाहीजे.

**(३)** सदर उमेदवारास शासकीय सेवेचा राजीनामा द्यावयाचा असेल किंवा शासकीय नोकरी अन्य कोणत्याही मार्गाने सोडायची असेल तर, त्यांनी शासनाला कमीत कमी एक महिन्याची पूर्वसूचना दिली पाहीजे. अथवा एक महिन्याची आगाऊ वेतनपूर्ती केल्या शिवाय सेवा सोडता येणार नाही.

**(४)** त्यांना त्यांचे सेवाकालावधीत केंद्र शासनाने विहित केलेल्या अटीवर चार वर्षाच्या कालावधीकरिता (प्रशिक्षण कालावधी धरुन) जरुर पडल्यास भारत संरक्षण किवा संरक्षण सेवेशी संबंधीत अशा पदावर काम करावे लागेल. हे दायित्व सेवेच्या पहिल्या दहा वर्षापर्यंत मर्यादित राहील व ४५ वर्षे वयानंतर सर्वसाधारणपणे लागू होणार नाही.

**(५)** त्यांना शासन विहित करील त्याप्रमाणे प्रशिक्षण पार पाडावे लागेल.

**(६)** त्यांनी हिंदी आणि मराठी भाषा परिक्षेसंबधीच्या नियमावलीनुसार जर ते या परीक्षा अगोदरच उत्तीर्ण झाले नसतील किंवा त्यांना उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर त्यांनी एतदर्थ मंडळाची मराठी/हिंदी भाषा परीक्षा विहित मुदतीत उत्तीर्ण होणे आवश्यक राहील.

**(७)** सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. प्रशिक्षण-२०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दि. ७.८.२००० अन्वये शासन सेवेतील नियुक्तीकरीता संगणक हाताळणी/वापराबाबतचे ज्ञान एक आवश्यक अर्हता म्हणून निश्चिती करण्यात आली आहे. त्यानुसार सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. प्रश्क्षिण-२०००/प्र.क्र. ६१/२००१/३९, दि. १९.३.२००३ अन्वये आवश्यक प्रमाणपत्र संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचेकडे नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून विहित मुदतीत उपलब्ध करुन देणे आवश्यक राहील.

(८) सदर उमेदवाराचे वेतन मॅट्रीक्समधील वेतनस्तर एस-२३ : ६७७००-२०८७०० असे राहील व त्यांना नियमानुसार अनुज्ञेय भत्ते देय राहतील.

(९) सदर उमेदवारांचे वेतन महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील तरतुदीनुसार निश्चित केले जाईल.

(१०) सदर पदाच्या निवडीकरिता सादर केलेल्या सर्व प्रमाणपत्रांची (जाती विषयक प्रमाणपत्रासह) सत्यासत्यता तपासण्यात येत आहे. यापैकी कोणतेही प्रमाणपत्र अवैध किवा खोटे, बनावट आढल्यास उमेदवाराचे नियुक्तीचे आदेश कोणत्याही टप्प्यावर रद्द करण्यात येतील संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांनी सदरहू उमेदवारांस रुजू करुन घेतेवेळी त्यांची सर्व प्रमाणपत्रे तपासून घ्यावीत.

(११) सदर उमेदवारांस वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र. अंनियो-१००९/प्र.क्र.३२/सेवा-४, दि.१८.८.२००९ मधील तरतूदीनुसार, दिनांक १ नोव्हेंबर, २००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेच्या पदावरील कार्यरत असलेल्या शासकीय कर्मचाऱ्यांचे त्याच किंवा अन्य विभागातील निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेच्या पदावरील नियुक्तीसाठी दिनांक १ नोव्हेंबर, २००५ रोजी किंवा त्यानंतर अर्ज केला असेल आणि त्याला दिनांक १ नोव्हेंबर, २००५ रोजी किंवा त्यानंतर नवीन पदावर नियुक्त करण्यात आले असेल तर अशा प्रकरणी वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अंनियो-१००६/८७/सेवा-४, दि. १२ जानेवारी, २००७ मधील (i) ते (iv) येथे नमूद केलेल्या सर्व अटींची पूर्तता झाल्यास सबंधीत शासकीय कर्मचाऱ्यास महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू ठरेल. दि. १८.८.२००९ च्या परिपत्रकात नमूद केल्याप्रमाणे (i) ते (iv) येथील सर्व अटींची ज्याप्रकरणी पूर्तता होत नसेल, अशा शासकीय कर्मचाऱ्यास “नवीन परिभाषित अंशदान निवृत्ती योजना” लागू ठरेल.

(१२) सदर उमेदवार हे यापूर्वी शासकीय सेवेत कार्यरत असल्यास त्यांच्याविरुध्द काही विभागीय चौकशी प्रलंबित अथवा प्रस्तावित असल्यास त्यांची नियुक्ती सदर विभागीय चौकशीच्या अधीन राहील.

(१३) सदर उमेदवारांना नियुक्तीचे आदेश प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत नियुक्ती स्विकारणे आवश्यक राहील. विहित कालावधीत उमेदवार पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू झाला नाही तर एक महिन्यानंतर सदर नियुक्ती आदेश आपोआपच रद्दबातल होतील. तो नोकरीची संधी गमावेल व त्याचा नियुक्तीकरिता विचार करण्यात येणार नाही. यासाठी उमेदवारांकडून देण्यात येणाऱ्या कोणत्याही कारणांचा/विनंतीचा विचार केला जाणार नाही.

(१४) सदर नियुक्ती मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल मूळ अर्ज क्र.१०२६/२०२२ व १०२७/२०२२ च्या अंतीम निकालाच्या /आदेशाच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

**३.** वरील तक्त्यातील अ.क्र.५ येथील डॉ. अमोल विश्वनाथ धुळधुळे यांच्या पदस्थापनेमुळे डॉ. अनिल आनंदराव कावरखे (बदलीपात्र) हे पदस्थापनेविना राहणार असुन, त्यांच्या पदस्थापनेचे आदेश यथावकाश निर्गमित करण्यात येणार असल्याने, पुढील आदेशापर्यंत डॉ. अनिल आनंदराव कावरखे हे उप संचालक, आरोग्य सेवा, अकोला मंडळ, अकोला या कार्यालयात हजर होतील व त्यांचे मुख्यालय तेच राहील.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०४२८१४५४४०२११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHIVDAS
MAHADEO
DHULE

Digitally signed by SHIVDAS MAHADEO DHULE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fd353a6a1af02b28757a9a542f2f807ba459543ed19dc809f2f150cfde4470c9, pseudonym=FFAC916764FCC27FA561F44ED9FF58B3C8CD943C, serialNumber=55231903025208911890F58514593563E9788A66733F9A7E0D1A454083659841, cn=SHIVDAS MAHADEO DHULE
Date: 2023.05.02 10:29:40 +05'30'

**( शि. म. धुळे )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
२) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई .
४) संचालक, आरोग्य सेवा (२), पुणे.
५) सह संचालक, आरोग्य सेवा (सर्व).
६) उपसंचालक, आरोग्य सेवा, सर्व परिमंडळे.
७) जिल्हा शल्यचिकित्सक, सामान्य/जिल्हा रुग्णालये (सर्व).
८) जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
९) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१ , मुंबई / महाराष्ट्र -२ , नागपूर.
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र -१ , मुंबई / महाराष्ट्र -२ , नागपूर.
११) अधिदान व व लेखाधिकारी, मुंबई
१२) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व).
१३) मा.मंत्री (आरोग्य) / मा. राज्यमंत्री (आरोग्य), मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव,
१४) सर्व अवर सचिव / कक्ष अधिकारी, सार्वजनिक आरोग्य विभाग
१५) प्रधान सचिव, सा. आ. विभाग, मंत्रालय यांचे स्वीय सहायक
१६) सचिव (२), सा. आ. विभाग, मंत्रालय यांचे स्वीय सहायक
१७) सर्व सहसचिव/उपसचिव सार्वजनिक आरोग्य विभाग यांचे स्वीय सहायक
१८) सर्व संबंधित अधिकारी (संचालक, आरोग्य सेवा (१), मुंबई यांचेमार्फत)
१९) निवड नस्ती (सेवा-२)